**श्रीमती इंद्रा मालो, भा.प्र.से. यांच्या उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ (माविम) या पदावरील प्रतिनियुक्तीच्या अटी / शर्ती विहीत करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## महिला व बाल विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांक-माविम-२०१७/प्र.क्र.६८/का-१०

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख-१४ जून, २०१७.

**वाचा :-**

१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक-एईओ-१०१६/प्र.क्र.४६/२०१६/दहा, दि.९.१२.२०१६.

**शासन निर्णय :-**

श्रीमती इंद्रा मालो, भा.प्र.से.यांची संदर्भीय आदेशान्वये उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ (माविम), मुंबई या पदावर प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आली आहे. त्यानुषंगाने श्रीमती इंद्रा मालो, भा.प्र.से. यांच्या उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, माविम या पदावरील प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती सदर शासन निर्णयान्वये पुढीलप्रमाणे विहित करण्यात येत आहेत.

**(१) प्रतिनियुक्तीचा कालावधी :-** श्रीमती इंद्रा मालो, ह्या दिनांक ३०.११.२०१६ ते शासनाच्या पुढील आदेशापर्यंत वरील स्वीयेत्तर सेवेत प्रतिनियुक्तीवर असतील. मात्र,

अ) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनास आवश्यक वाटली तर त्यांना त्यांच्या प्रतिनियुक्तीचा कालावधी पूर्ण होण्यापूर्वी स्वीयेत्तर सेवेतून केंव्हाही परत बोलावण्याचा हक्क शासनास असेल.

ब) त्यांच्या सेवेची आवश्यकता महिला आर्थिक विकास महामंडळास नसेल तर ते त्यांना शासन सेवेत परत पाठवू शकतात. मात्र ज्या दिनांकापासून तसे करावयाचे असेल त्याच्या कमीत कमी तीन महिने अगोदर तसे कळविणे आवश्यक राहील.

**(२) वेतन :-** श्रीमती इंद्रा मालो ह्या सदर प्रतिनियुक्तीच्या कालावधीत उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक हे पद धारण करतील व सदर कालावधीत त्यांना वेतन मॅट्रिक्स स्तर क्र.१४ मधील कक्ष क्र.४ येथील सुधारित वेतन रू.१,५७,६००/- इतके अनुज्ञेय राहील. त्यांच्या वार्षिक वेतनवाढी मंजूर करण्याबाबत आदेश शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाकडून (का-९ अ) निर्गमित करण्यात येतील.

**(३) प्रतिनियुक्ती भत्ता :-** श्रीमती इंद्रा मालो, भा.प्र.से. यांना प्रतिनियुक्तीच्या सदर कालावधीत शा.नि. सा.प्र.वि. क्र.भाप्रसे-३०१३/३१२/२०१३/९, दि.११.९.२०१३ अन्वये निर्गमित केलेल्या तरतुदीनुसार (दरमहा मूळ वेतनाच्या ५ टक्के/ १० टक्के दराने) प्रतिनियुक्ती भत्ता महिला आर्थिक विकास महामंडळ देईल. तसेच सदर कालावधीत त्यांना जरी त्यांच्या अंतिम वेतन प्रमाणपत्रातही तसे नमूद केले असले तरी त्यांना विशेष वेतन अनुज्ञेय असणार नाही.

**(४) महागाई भत्ता :-** श्रीमती इंद्रा मालो, यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत, अखिल भारतीय सेवा अधिकाऱ्यांना वेळोवेळी ज्या दराने महागाई भत्ता अनुज्ञेय असेल, त्या दराने महागाई भत्ता अनुज्ञेय असेल.

**(५) स्थानिक पुरक भत्ता :-** श्रीमती इंद्रा मालो, यांना राज्य शासनाच्या नियमांनुसार / आदेशानुसार वेळोवेळी अनुज्ञेय असेल त्या दराने स्थानिक पुरक भत्ता अनुज्ञेय असेल. मात्र सहाव्या व सातव्या वेतन आयोगानुसार भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांसंदर्भात निर्गमित केलेले आदेश त्यांना लागू राहतील.

**(६) निवासस्थान किंवा त्याऐवजी घरभाडे भत्ता :-** श्रीमती इंद्रा मालो, यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांच्या दर्जास साजेसे निवासस्थान महिला आर्थिक विकास महामंडळ देईल. तथापि महिला आर्थिक विकास महामंडळ त्यांना योग्य असे निवासस्थान देवू शकत नसेल तर आणि त्यांच्या ताब्यात प्रतिनियुक्तीवर जाण्यापूर्वी शासकीय निवासस्थान असेल तरच ते शासकीय निवासस्थान प्रतिनियुक्तीच्या कालावधीत आपल्या ताब्यात ठेऊ शकतात. मात्र, प्रतिनियुक्तीवर गेल्याच्या दिनांकापासून पहिले तीन महिने त्यांना विहित सामान्य दराने व त्यानंतर आर्थिक दराने शासकीय निवासस्थानाचे अनुज्ञप्ती शुल्क व सेवाशुल्क भरणे आवश्यक आहे. महिला आर्थिक विकास महामंडळाच्या नियमानुसार त्यांना भाडेरहित तत्वावर निवासस्थान देय असेल तर त्याचा लाभ श्रीमती इंद्रा मालो यांना घेता येईल.

प्रतिनियुक्तीच्या सदर कालावधीत त्यांच्या ताब्यात शासकीय किंवा संस्था यांचे निवासस्थान नसेल तर त्यांना राज्यशासनाच्या नियमानुसार वेळोवेळी अनुज्ञेय असलेला घरभाडे भत्ता अनुज्ञेय असेल. मात्र सहाव्या व सातव्या वेतन आयोगानुसार भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांसंदर्भात निर्गमित केलेले आदेश त्यांना लागू राहतील.

**(७) पदग्रहण अवधी वेतन आणि बदली प्रवास भत्ता :-** श्रीमती इंद्रा मालो यांना त्यांची स्वीयेत्तर सेवेत बदली झाल्यानंतर आणि तेथून परत आल्यानंतर, अशा दोन्ही वेळच्या पदग्रहण अवधी मध्ये त्यांचे वेतन व प्रवासभत्ता, तो अधिकारी ज्या शासनाच्या सेवेत असताना स्वीयेत्तर सेवेत गेला असेल ते शासन व स्वीयेत्तर सेवेतून परत आल्यानंतर ज्या शासनाच्या सेवेत जाणार असेल ते शासन यांच्या संबंधित नियमानुसार महिला आर्थिक विकास महामंडळ देईल.

**(८) प्रतिनियुक्तीच्या कालावधीत कर्तव्यार्थ केलेल्या प्रवासाकरिता प्रवासभत्ता :-** श्रीमती इंद्रा मालो, यांना स्वीयेत्तर सेवेत रुजू झाल्यानंतर कर्तव्यार्थ कराव्या लागणाऱ्या प्रवासाकरीता राज्य शासनाच्या संबंधित नियमान्वये किंवा या संस्थेच्या नियमान्वये यापैकी ज्यांचे नियम अधिक फायदेशीर असतील त्या नियमानुसार प्रवासभत्ता आणि दैनिक भत्ता अनुज्ञेय असेल.

**(९) रजा :-** श्रीमती इंद्रा मालो, यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अखिल भारतीय सेवा (रजा) नियम, १९५५ हे नियम लागू असतील. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांना नैमित्तिक रजेव्यतिरिक्त इतर प्रकारची रजा मंजूर करण्यास शासन (सा.प्र.वि./का-१०) सक्षम असेल. स्वीयेत्तर सेवेच्या कालावधीत अथवा सेवानिवृत्तीच्या वेळेस घेतलेल्या रजेच्या कालावधीबद्दल द्यावयाच्या रजा वेतनाचा व स्थानिक पूरक भत्त्यावरील संपूर्ण खर्च महिला आर्थिक विकास महामंडळास सोसावा लागेल.

**(१०) विकलांगता रजेबद्दल रजा वेतन :-** स्वीयेत्तर सेवेत किंवा अशा सेवेमुळे आलेल्या विकलांगतेबद्दल मंजूर करण्यात येणाऱ्या रजेच्या संबंधात, अशा विकलांगता स्वीयेत्तर सेवा संपल्यानंतर उघडकीस आली, तरी सुध्दा रजा वेतन देण्यास महिला आर्थिक विकास महामंडळ जबाबदार असेल व अशा रजा वेतनाचा खर्च महिला आर्थिक विकास महामंडळाकडून वसूल करण्यात येईल.

**(११) रजा वेतन व निवृत्ती वेतन अंशदाने :-** श्रीमती इंद्रा मालो, भा.प्र.से. यांच्या रजा वेतन व निवृत्ती वेतन अंशदानाबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.भाप्रसे १४१३/प्र.क्र.२२०/ २०१३/ ९-अ, दि.१२.२.२०१४ मधील तरतुदीनुसार प्रत्येक आर्थिक वर्षाच्या समाप्तीपासून १५ दिवसांच्या आत किंवा जर स्वीयेत्तर सेवा आर्थिक वर्ष संपण्यापूर्वी समाप्त झाली असेल तर स्वीयेत्तर सेवा समाप्तीनंतर भरणा करील. या रकमा दोन वेगवेगळ्या डिमांड ड्राफ्टव्दारे (पहिला रजावेतन अंशदानाच्या रकमेचा व दुसरा निवृत्तीवेतन अंशदानाच्या रकमेचा) सहायक संचालक (लेखा), सामान्य प्रशासन विभाग/ का.९-अ, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांच्याकडे पाठविणे आवश्यक आहे. सदर डिमांड ड्राफ्ट बृहन्मुंबईतील कोणत्याही अनुसूचित बँकेचे "सहायक संचालक (लेखा), सामान्य प्रशासन विभाग/ का.९-अ, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२" यांच्या नावे काढलेले असणे आवश्यक आहे. श्रीमती इंद्रा मालो, भा.प्र.से. यांच्या बाबत रजा वेतन व निवृत्ती वेतन अंशदान महिला आर्थिक विकास महामंडळ शासनाशी (सा.प्र.वि.-९ अ) संपर्क साधून (रकमांची माहिती घेऊन) प्रत्येक आर्थिक वर्षाच्या समाप्तीपासून १५ दिवसांच्या आत किंवा जर स्वीयेत्तर सेवा आथिर्क वर्ष संपण्यापूर्वी समाप्त झाली असेल तर स्वीयेत्तर सेवा समाप्तीनंतर भरणा करील. या रकमा दोन वेगवेगळया डिमांड ड्राफ्टद्वारे (पहिला रजा वेतनाच्या रकमेचा व दुसरा निवृत्तीवेतन अंशदानाच्या रकमेचा ) सहायक संचालक, सामान्य प्रशासन विभाग /का-९-अ, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांच्याकडे पाठविणे अत्यावश्यक आहे. सदर डिमांड ड्राफ्ट बृहन्मुंबईतील कोणत्याही अनुसूचित बँकेचे सहाय्यक संचालक (लेखा) सामान्य

प्रशासन विभाग /का-९-अ, मंत्रालय, मुंबई यांच्या नांवे काढलेले असणे आवश्यक आहे. सदर रकमा पुढील लेखाशिर्षाखाली जमा दर्शविण्यात याव्यात.

(अ) **रजा वेतन :-** ००७० इतर प्रशासकीय सेवा -६० इतर सेवा -८००-इतर जमा रकमा (नऊ) अखिल भारतीय सेवेतील जे अधिकारी स्वीयेत्तर सेवेत प्रतिनियुक्तीवर आहेत, त्यांच्याबाबत रजावेतन अंशदान (००७१ ००१६).

(ब) **निवृत्तीवेतन अंशदान :-** ००७१ निवृत्तीवेतन व इतर सेवा निवृत्ती लाभ यांच्या वसूलीसंबंधातील अंशदाने व वसुलीच्या रकमा-०१-नागरी-१०१-अभिदाने व अंशदाने (एक) स्वीयेत्तर सेवा अधिकारी (००७१ ००१२).

**टीप :-** प्रतिनियुक्तीच्या कालावधीतील उपरोक्त रकमांचा भरणा करण्यास विलंब झाल्यास महिला आर्थिक विकास महामंडळ विलंब कालावधीतील दंडात्मक व्याज भरण्यास जबाबदार राहील.

**(१२) नैमित्तिक रजा :-** श्रीमती इंद्रा मालो, यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत राज्य शासनाच्या नियमानुसारच नैमित्तिक रजा उपभोगता येईल. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत नैमित्तिक रजा मंजूर करण्यास, संस्थेच्या कार्यकारी प्रमुखास दुय्यम असलेल्या अधिकाऱ्यांना संस्थेचे कार्यकारी प्रमुख व संस्थेच्या कार्यकारी प्रमुखास संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग सक्षम असेल.

**(१३) रजा प्रवास सवलत :-** श्रीमती इंद्रा मालो, भा.प्र.से यांना अ.भा.से. (रजा प्रवास सवलत) नियम, १९७५ मधील तरतूदीनुसार रजा प्रवास सवलत मिळण्याचा हक्क असेल. याबाबतचा खर्च महिला आर्थिक विकास महामंडळ या संस्थेस सोसावा लागेल. त्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत नैमित्तीक रजा वगळता इतर रजा कालावधीतील रजा प्रवास सवलत मंजूर करण्यास शासन (सा.प्र.वि./का-१०) सक्षम असेल. (शासन परिपत्रक सा.प्र.वि. भाप्रसे-२१०५/७४/२००५/९, दि.६.१२.२००५)

**(१४) वैद्यकीय सवलती :-** श्रीमती इंद्रा मालो, भा.प्र.से. यांना अ.भा.से. (वैद्यकीय देखभाल) नियम, १९५४ मधील तरतुदीनुसार वैद्यकीय सुविधांचा लाभ अनुज्ञेय असेल. याबाबतचा खर्च महिला आर्थिक विकास महामंडळ या संस्थेस सोसावा लागेल. मात्र सदर संस्थेचे त्यांच्या कर्मचाऱ्यांसाठी वैद्यकीय सवलती देण्याबाबत वेगळे नियम असतील आणि त्याचा लाभ ते घेऊ इच्छित असतील तर प्रतिनियुक्ती कालावधीत त्या नियमांचा लाभ घेण्याबाबत विकल्प देण्याचे स्वातंत्र्य त्यांना असेल. (शा.नि. सा.आ.वि. २००५/९/१/आ.३, दि.१९.३.२००५ व शा.नि.सा.आ.वि. २०११/३३३/११/राकावि-२, दि.१६.११.२०११)

**(१५) भविष्य निर्वाह निधी :-** श्रीमती इंद्रा मालो, भा.प्र.से यांनी प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अ.भा.से. (भविष्य निर्वाह निधी), नियम १९५५ मधील तरतूदीनुसार, भविष्य निर्वाह निधीची वार्षिक वर्गणी दरमहा त्यांच्या वेतनातून भरणे आवश्यक आहे. ही वर्गणी ८००९-राज्य भविष्य निर्वाह निधी -०१-नागरी-१०४ अखिल भारतीय सेवा भविष्य निर्वाह निधी ८००९-५०३-९ या लेखाशिर्षाखाली जमा

दर्शविण्यात यावी. सदर रकमेचा धनादेश त्यांचे भविष्य निर्वाह निधी खाते महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), एक / दोन, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर यापैकी ज्या महालेखापालांकडे असेल त्या महालेखापालांच्या नावे काढून भविष्य निर्वाह निधी अनुसूचीसह त्यांच्याकडे पाठविण्यात यावा. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांना त्यांच्या भ.नि.नि. खात्यातून परताना/ ना-परतावा अग्रीम मंजूर करण्यास शासन (साप्रवि/१०) सक्षम असल्यामुळे याबाबतचे अर्ज सामान्य प्रशासन विभागाकडे मंजूरीकरिता पाठविण्यात यावेत. .

**(१६) विभागीय चौकशी :-** श्रीमती इंद्रा मालो यांच्याविरुध्द विभागीय चौकशीबाबत अखिल भारतीय सेवा (शिस्त व अपील) नियम, १९६९ हे नियमानुसार असतील. प्रतिनियुक्तीवर असताना त्यांचेविरुध्द विभागीय चौकशी करावयाची असेल तर त्यांना शासन सेवेत प्रत्यावर्तीत करण्यात येईल. यासंबंधी कारवाई अंतर्गत त्यांना निलंबित केल्यास निलंबनाधीन कालावधीत त्यांना शासन निर्वाह भत्ता देईल. मात्र निर्वाह भत्त्याची रक्कम महिला आर्थिक विकास महामंडळाकडून वसूल करण्यात येईल.

**(१७) बोनस किंवा सानुग्रह अनुदान :-** श्रीमती इंद्रा मालो, यांना बोनस किंवा सानुग्रह अनुदान अनुज्ञेय नाही. महिला आर्थिक विकास महामंडळाच्या नियमानुसार जरी त्यांना बोनस अथवा सानुग्रह अनुदान अनुज्ञेय असले तरी ते त्यांना स्विकारता येणार नाही.

**(१८) गट विमा योजना :-** श्रीमती इंद्रा मालो, भा.प्र.से. यांच्या वेतनातून दरमहा नियमानुसार रक्कम राज्य/ केंद्र शासकीय कर्मचारी गट विमा योजनेच्या वर्गणीपोटी महिला आर्थिक विकास महामंडळ ही संस्था दरमहा वसूल करील आणि ही रक्कम धनादेशाव्दारे महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), एक, महाराष्ट्र, मुंबई यांच्याकडे पाठवेल. ही रक्कम (केंद्र शासकीय कर्मचारी गट विमा सदस्यांबाबत) "८६५८ सस्पेन्स अकाऊंटस १२३- ऑल इंडिया सर्व्हिसेस ऑफिसर्स ग्रुप इन्शुरन्स स्कीम रिकव्हरीज टूवर्डस सेंट्रल गव्हर्मेंट एम्प्लॉईज ग्रुप इन्शुरन्स स्कीम मेड एप्लीकेबल टू ऑल इंडिया सर्व्हिसेस ऑफिसर्स बॉर्न ऑन दि महाराष्ट्र केडर सबस्क्रीप्शन (आयएस ८६५८-८६२-८)" या लेखाशिर्षाखाली जमा दर्शविण्यात यावी. (साप्रवि शासन नर्णिय क्र.भाप्रसे २६०३/ प्र.क्र.२६०/०३/९, दि.१०.८.२००४) गट विमा योजनेची रक्कम धनादेशाव्दारे भरल्यानंतर त्याचे विवरणपत्र दरमहा सामान्य प्रशासन विभाग / ९ (अ) यांच्याकडे पाठविण्यात यावे. सदर वर्गणी भरण्यास विलंब करण्यात आल्यास विलंब कालावधीत दंडनीय दराने व्याज आकारण्यात येईल.

**(१९) मोटार कार :-** श्रीमती इंद्रा मालो, यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीत वापरासाठी महिला आर्थिक विकास महामंडळ वाहन उपलब्ध करुन देईल. सदर वाहनांचा खाजगी वापर पुढील अटींच्या अधीनतेने त्यांना करता येईल.

अ) वाहनाचा खाजगी वापर दरमहा २५० किलोमीटरहून अधिक होता कामा नये. यासाठी त्यांनी वेळोवेळी विहित करण्यात येणाऱ्या दराने भाडे संस्थेस द्यावे लागेल.

ब) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक:- प्रवास-१०९०/प्र.क्र.३२०/ ९०/सेवा-५, दिनांक १७.१०.१९९० अन्वये निर्गमित केलेल्या आदेशानुसार वाहनाच्या खाजगी वापरास परवानगी असेल. मात्र संबंधित आदेशात वेळोवेळी ज्या सुधारणा केल्या जातील त्या सुधारणाही वाहनाच्या खाजगी वापराबाबत आपोआप लागू असतील.

**(२०) अग्रिम :-** श्रीमती इंद्रा मालो, यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत, भविष्य निर्वाह निधी परतावा प्राप्त / ना परतावा अग्रीम, घरबांधणी अग्रीम, मोटारकार अग्रीम, वैयक्तिक संगणक अग्रीम मंजूर करण्यास शासन (सा.प्र.वि.) सक्षम असेल याबाबतचे त्यांचे अर्ज सामान्य प्रशासन विभाग / का-९, मंत्रालय, मुंबई यांचेकडे मंजूरीसाठी पाठविण्यात यावे. महिला आर्थिक विकास महामंडळाने त्यांना सदर अग्रीम मंजूर करु नये.

**(२१) प्रतिनियुक्तीवर असताना रजेवरुन अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर :-** श्रीमती इंद्रा मालो ह्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीत रजेवर गेल्या किंवा प्रशिक्षणासाठी गेल्या आणि ते धारण करीत असलेल्या पदावर अन्य अधिकाऱ्याची नियुक्ती करण्यात आली आणि रजेवर अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर त्यांची नियुक्ती अन्य पदांवर करण्यात आली तर रजावेतन, वेतन, पदग्रहण अवधी, सक्तीचा खोळंबा कालावधी इत्यादीबाबत सर्व खर्च, रजा समाप्तीच्या अथवा प्रशिक्षण समाप्तीच्या दिनांकापासून ते अन्य पदाचा कार्यभार धारण करेपर्यंतच्या दिनांकापर्यंत महिला आर्थिक विकास महामंडळ सोसेल.

**(२२) निवासी शिपायाऐवजी रोखभत्ता :-** महिला आर्थिक विकास महामंडळात प्रतिनियुक्तीच्या कालावधीत श्रीमती इंद्रा मालो, यांच्या निवासस्थानी शिपाई दिला नसल्यास व श्रीमती इंद्रा मालो यांना प्रतिनियुक्तीवर जाण्यापूर्वी निवासी शिपायाऐवजी रोखभत्ता अनुज्ञेय असल्यास त्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्याच दराने निवासी शिपायाऐवजी रोखभत्ता अनुज्ञेय असेल. मात्र, असा भत्ता घेण्यापूर्वी दरमहा अधिकाऱ्यांचे निवासी शिपाई देण्यात आलेला नाही असे प्रमाणपत्र संबंधित अधिकाऱ्याने देणे आवश्यक राहील.

**(२३) शासनाने वेळोवेळी विहित केलेले नियम लागू करणे :-** श्रीमती इंद्रा मालो, यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत शासन वेळोवेळी जे नियम करील किंवा जे कार्यकारी आदेश निर्गमित करील ते नियम / कार्यकारी आदेश लागू असतील.

**(२४) प्रतिनियुक्तीच्या कालावधीत देशात/ परदेशात प्रवास :-** महिला आर्थिक विकास महामंडळामध्ये प्रतिनियुक्तीवर असताना, सदर संस्थेच्या कामासंबंधात देशात कोठेही प्रवास करावयाचा झाल्यास शासनाच्या पूर्वपरवानगीची आवश्यकता असणार नाही. मात्र, संस्थेच्या कामासंबंधात परदेशी जावयाचे असल्यास, शासनाची पूर्वपरवानगी आवश्यक असेल. त्याचप्रमाणे संस्थेशी प्रत्यक्ष संबंध नसलेल्या शासकीय निमशासकीय कामानिमित्त अथवा खाजगी संस्थांच्या

समारंभासाठी देशांतर्गत प्रवास करावयाचा असल्यास त्यासाठी शासनाची पूर्व परवानगी घेणे आवश्यक राहील.

**(२५) विहित अटी शर्तींमध्ये समाविष्ट नसलेल्या अटी / शर्तींबाबत :-** वर नमूद केलेल्या अटी / शर्ती मध्ये समाविष्ट नसलेल्या विशिष्ट अटी / शर्ती बाबत महाराष्ट्र शासन संवर्गातील भारतीय प्रशासन सेवा अधिकाऱ्यांना जे नियम, विनियम आणि कार्यकारी आदेश लागू असतील ते नियम, विनियम व कार्यकारी आदेश लागू असतील.

हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८२९/का.दहा, दि.६ जून, २०१७ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०६१४१६२८०३४६३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind P Shenoy

Digitally signed by Milind P Shenoy
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Womens And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5a1cf9161e18ca8fa3b7a2263c18944e06f156ba19752cad5615c266d0b4ffb8, cn=Milind P Shenoy
Date: 2017.06.14 16:25:42 +05'30'

**( मि.प.शेणॉय )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१ ( लेखा व अनुज्ञेयता ) / (लेखा परिक्षा), मुंबई.
२. श्रीमती इंद्रा मालो, व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. सामान्य प्रशासन विभाग (का-१०,९,९-अ), मंत्रालय, मुंबई.
६. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती, का-१०.